**प्रयोगात्मक कलेच्या क्षेत्रात कार्य करणाऱ्या नोंदणीकृत संस्थांना सहाय्यक अनुदान देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग,**
**शासन निर्णय क्र .संकीर्ण ८२२३/ प्र.क्र.१०१/सां.का.४**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : २१ मार्च, २०२४

**वाचा :-** १.शासन निर्णय, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, क्रमांक प्रकक्षे/सहाअ २०१२/प्र.क्र.१५१/सांका.४, दिनांक २४ जुलै, २०१२
२.संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय, मुंबई यांचे पत्र क्र. सांकासं/ ८३४, दि. १४ फेब्रुवारी, २०२४

**प्रस्तावना :**

प्रयोगात्मक कलेच्या क्षेत्रात कार्य करणाऱ्या नोंदणीकृत संस्थांना सहाय्यक अनुदान योजनेतंर्गत उपर्निर्दिष्ट क्र. १ येथील शासन निर्णयान्वये प्रयोगात्मक कला क्षेत्रातील पात्र संस्थांना सहाय्यक अनुदान देण्यात येते. त्यानुषंगाने सन २०२३-२४ या आर्थिक वर्षाकरीता पात्र ठरलेल्या नोंदणीकृत संस्थांना सहायक अनुदान देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:**

प्रयोगात्मक कलेच्या क्षेत्रात कार्य करणाऱ्या नोंदणीकृत संस्थांना सहाय्यक अनुदान योजनेतंर्गत सन २०२३-२४ या आर्थिक वर्षाकरीता प्रयोगात्मक कला क्षेत्रातील परिशिष्ट-अ मधील पात्र १२ नोंदणीकृत संस्थांना १३.०० लक्ष (अक्षरी रुपये तेरा लक्ष फक्त) इतक्या सहाय्यक अनुदानास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

०२. सदर खर्च लेखाशिर्ष मागणी क्र. झेडी-२,२२०५ कला व संस्कृती, कला व सांस्कृतिक संस्था, (०५) कला व सांस्कृतिक संस्थांना सहाय्यक अनुदान, (०५) (०१) कला व सांस्कृतिक संस्थांना सहाय्यक अनुदान (२२०५ १६२३) ३१ सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) या लेखाशिर्षाखाली सन २०२३-२४ या वर्षासाठी मंजूर असलेल्या आर्थिक तरतुदीतून भागविण्यात यावा.

३. यासाठी संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय यांना नियंत्रण अधिकारी तसेच लेखाधिकारी, सांस्कृतिक कार्य संचालनालय यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

४. सदर खर्च वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र. विअप्र-२०१३/विनिमय, दिनांक १७ एप्रिल, २०१५, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग-पहिला, उपविभाग-३, अ.क्र. ४ परिच्छेद क्र. २७ (२) (अ) अन्वये प्रशासकीय विभागास प्राप्त अधिकारानुसार मंजूर करण्यात येत आहे.

४ अ. "शासन निर्णय क्रमांक प्रकक्षे/सहाअ २०१२/प्र.क्र.१५१/सां.का.४, दिनांक २४ जुलै, २०१२ सोबतचे जोडपत्र मधील परिच्छेद क्रमांक ११ अन्वये संस्थांनी प्रयोगात्मक कलेच्या क्षेत्रात मागील तीन वर्षात केलेल्या कार्याचा आढावा घेऊनच संस्थांना सहायक अनुदान मंजूर करण्यात येत असल्यामुळे सदर खर्च बिनशर्त असून उपयोगीता प्रमाणपत्र सादर करण्याची आवश्यकता नाही."

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०२४०३२११२३७१९९३२३ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

ANIROODHA SURYAKANT DESHPANDE

Digitally signed by ANIROODHA SURYAKANT DESHPANDE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TOURISM AND CULTURAL AFFAIRS DEPARTMENT, 2.5.4.20=d34fa92fd12dd57b9647dbd172129b5c0eb8b1cd7ff442b98831311214458302, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=0D09B1312327B281B742D56CD04EE1899269D4FAAF88991AC3364BDCC437CF37, cn=ANIROODHA SURYAKANT DESHPANDE
Date: 2024.03.21 12:48:25 +05'30'

**(अनिरुध्द सु. देशपांडे)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. मंत्री (सांस्कृतिक कार्य) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. प्रधान सचिव (सां.का.) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
३. उप सचिव (सां.का.४) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
४. संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय, जुने सचिवालय इमारत, पहिला मजला, एम. जी. रोड, मुंबई ४०० ०३२.
५. कार्यासन अधिकारी (अर्थसंकल्प), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई
६. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) - १, महाराष्ट्र राज्य, मुंबई
७. महालेखापाल (लेखापरीक्षा) - १, महाराष्ट्र राज्य, मुंबई
८. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) - २, महाराष्ट्र राज्य, नागपूर
९. महालेखापाल (लेखापरीक्षा) - २, महाराष्ट्र राज्य, नागपूर
१०. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
११. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
१२. निवड नस्ती, सां.का.४

शासन निर्णय क्र. संकीर्ण ८२२३/ प्र.क्र.१०१/सां.का.४ दिनांक : २१ मार्च, २०२४

## परिशिष्ट - अ

## पात्र १२ संस्थांची यादी

| अ.क्र. | पात्र संस्थेचे नाव | रक्कम रुपये |
|---|---|---|
| १ | कलगी तुरा समाज उन्नती मंडळ, मुंबई | १,००,०००/- |
| २ | सुरसिंगार संसद, मुंबई Prstv २४ | १,००,०००/- |
| ३ | अथर्व स्कूल ऑफ फाइन आर्ट्स, मुंबई | ५०,०००/- |
| ४ | सम्यक कलांशा प्रतिष्ठान, मुंबई | ५०,०००/- |
| ५ | सरस्वती कला केंद्र अँड रिसर्च सेंटर, ठाणे | १,००,०००/- |
| ६ | शिव बहुउद्देशीय सेवाभावी संस्था, बीड | २,००,०००/- |
| ७ | अरुणोदय ग्रामीण व शहरी विकास संस्था, परभणी | ५०,०००/- |
| ८ | राष्ट्रसंत सम्यक संदेश फाउंडेशन, नागपूर | २,००,०००/- |
| ९ | चेतना मागासवर्गीय बहु. संस्था, नागपूर | २,००,०००/- |
| १० | रंगभूमी, नागपूर | १,००,०००/- |
| ११ | साई सर्वांगिण ग्रामीण समाज विकास संस्था, नागपूर | १,००,०००/- |
| १२ | ऋतुराज, नागपूर | ५०,०००/- |
| | **एकूण रुपये** | **१३,००,०००/-** |

(अक्षरी रुपये तेरा लक्ष फक्त)